गंगाधर शास्त्री गुणे आयुर्वेद महाविद्यालय व रूग्णालय,
जी.एस.गुणे चौक, विश्रामबाग, अहमदनगर-४१४ ००१
आयुर्वेद पदवी अभ्यासक्रमाच्या प्रवेश क्षमतेत वाढ करण्यास परवानगी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक.एमईडी १०२३/प्र.क्र.३०४/२३/शिक्षण-२**
गो.ते.रुग्णालयाची नवीन इमारत, ९ वा मजला, गो.ते. रुग्णालय संकुल,
नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
**दिनांक:- २३/०८/२०२४**

**संदर्भ:-** १. शासनाचे "ना-हरकत प्रमाणपत्र" समक्रमांक दिनांक १४/०९/२०२३.
२. भारतीय चिकित्सा पध्दति राष्ट्रीय आयोग, आयुष मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.आरईएफ.क्र.-३-३/एमएआरबी/२०२३-एवाय. (५), दिनांक ०३/०६/२०२४.
३. भारतीय चिकित्सा पध्दती राष्ट्रीय आयोग, आयुष मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. आरईएफ.क्र.-३-३/२०२४/एमएआरबी एवाय (५), दिनांक १२/०६/२०२४.

**प्रस्तावना :-** गंगाधर शास्त्री गुणे आयुर्वेद महाविद्यालय व रूग्णालय, जी.एस.गुणे चौक, विश्रामबाग, अहमदनगर या महाविद्यालयातील बी.ए.एम.एस. या पदवी अभ्यासक्रमाची प्रवेश क्षमता ५० वरुन ६० इतकी वाढ करण्यास संदर्भ क्र.१ अन्वये "ना-हरकत प्रमाणपत्र" देण्यात आले होते. सदर संस्थेस संदर्भ क्र.२ व ३ अन्वये भारतीय चिकित्सा पध्दति राष्ट्रीय आयोग, नवी दिल्ली यांनी सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षा करिता बी.ए.एम.एस. या पदवी अभ्यासक्रमाची प्रवेश क्षमता ५० वरुन ६० इतकी वाढ करण्यास मान्यता दिली आहे. भारतीय चिकित्सा पध्दति राष्ट्रीय आयोग, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेनुसार संस्थेस उक्त पदवी अभ्यासक्रमाची प्रवेशक्षमता वाढ करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** भारतीय चिकित्सा पध्दति राष्ट्रीय आयोग, नवी दिल्ली यांनी दिलेली मान्यता विचारात घेऊन गंगाधर शास्त्री गुणे आयुर्वेद महाविद्यालय व रूग्णालय, जी.एस.गुणे चौक, विश्रामबाग, अहमदनगर या महाविद्यालयातील बी.ए.एम.एस. या पदवी अभ्यासक्रमाची प्रवेशक्षमता शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करीता ५० वरुन ६० (१३ EWS जागांसह एकूण ७३) इतकी वाढ करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर मान्यता ही पुढील अटी व शर्तीस अधीन राहील:-

१) सदर आयुर्वेद महाविद्यालयातील पदवी अभ्यासक्रमाची विद्यार्थी प्रवेश क्षमता भारतीय चिकित्सा पध्दति राष्ट्रीय आयोग, नवी दिल्ली यांनी निर्धारित केल्यानुसार ६० (१३ EWS जागांसह एकूण ७३) इतकीच राहिल.

२) राज्य शासन/केंद्र शासन/मा.सर्वोच्च न्यायालय/मा.उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार सदर अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरिता निश्चित करण्यात आलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

३) शासकीय नियम/कायदा तसेच, मा.सर्वोच्च व मा.उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या निर्णयानुसार शैक्षणिक शुल्क आकारणीसाठी कार्यपध्दती अनुसरणे वेळोवेळी भाग असेल, त्याप्रमाणे शैक्षणिक शुल्क निश्चित करण्यात यावे.

४) केंद्र शासन, भारतीय चिकित्सा पध्दति राष्ट्रीय आयोग, नवी दिल्ली, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक व राज्य शासन यांनी वैद्यकीय अभ्यासक्रमाबाबत वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांचे व मानकांचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहिल.

५) महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिटयुशन्स (प्रोव्हिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ (महाराष्ट्र ॲक्ट १९९८ चा ६) मधील तरतूदींचे संस्थेने काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे.

६) महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांचे सदर जागांकरिता संलग्निकरण प्राप्त झाल्याशिवाय विद्यार्थी प्रवेशित करण्यात येऊ नयेत.

७) संस्थेने कोणत्याही परिस्थितीत शासनाने मान्य केलेल्या विद्यार्थी प्रवेशक्षमतेपेक्षा जास्त विद्यार्थी प्रवेशित करू नये.

८) महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांनी संस्थेस विद्यार्थी प्रवेश करण्यास परवानगी देण्यापूर्वी संस्था विहीत मानकांची पूर्तता करीत आहे याची खात्री करावी.

९) प्रस्तुत मान्यता ही सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षाकरीता प्रवेशित तुकडीच्या अंतिम वर्षाच्या परीक्षेपर्यंत लागू असून संस्थेने पुढील वर्षी विद्यार्थी प्रवेश करण्यापूर्वी भारतीय चिकित्सा पध्दती राष्ट्रीय आयोग, नवी दिल्ली/केंद्र शासनाच्या तसेच त्या आधारे राज्य शासनाच्या परवानगीचे अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

१०) भारतीय चिकित्सा पध्दती राष्ट्रीय आयोग, नवी दिल्ली यांच्या संदर्भ क्रमांक २ व ३ येथील पत्रामध्ये नमूद अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रस्तुत मान्यता देण्यात येत आहे.

**३.** सदर आदेश भारतीय चिकित्सा पध्दती राष्ट्रीय आयोग, नवी दिल्ली यांच्या संदर्भाधीन दिनांक ०३/०६/२०२४ व दिनांक १२/०६/२०२४ रोजीच्या पत्रान्वये दिलेली मान्यता विचारात घेऊन आणि महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम, १९९८ मधील कलम ६४(५) नुसार शासनास प्रदत्त असलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२४०८२३११५९३३४२१३** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**,**

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2024.08.23 19:15:18 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
७. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
९. सचिव, भारत सरकार, आरोग्य व कुटूंब कल्याण मंत्रालय, निर्माण भवन, नवी दिल्ली-११०००११
१०. सचिव, भारतीय चिकित्सा पध्दति राष्ट्रीय आयोग, टी-१९, ब्लॉक-४, धन्वंतरी भवन, पंजाबी बाग (पश्चिम), नवी दिल्ली-११००२६
११. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
१४. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, मुंबई
१५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय,मुंबई
१६. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
१७. सचिव,प्रवेश नियामक प्राधिकरण, मुंबई
१८. प्राचार्य, गंगाधर शास्त्री गुणे आयुर्वेद महाविद्यालय व रूग्णालय, जी.एस.गुणे चौक, विश्रामबाग, अहमदनगर-४१४ ००१
१९. निवडनस्ती (शिक्षण-२)